सरळ सेवा प्रवेशाने वर्ग-३ व वर्ग-४ मधील पदावर उमेदवारांची भरती करताना मुलाखती घेण्यासाठी येणा-या समाजकल्याण अधिकारी/जिल्हा आदिवासी विकास अधिकारी/जिल्हा प्रकल्प अधिकारी यांना १५दिवस अगोदर कळविण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : बीसीसी-२००१/१०४७/१६-ब,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २० नोव्हेंबर,२००१

वाचा :- (१) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक : बीसीसी-१०८८/ प्र.क्र.३/(८९)/१६-ब, दिनांक १५ मार्च,१९८९.
(२) सा.प्र.वि.परिपत्रक क्रमांक- १०८४/१७७/सीआर-७२/८४/१६-ब, दि.१ जानेवारी ८८.

शासन परिपत्रक :- शासकीय /निमशासकीय सेवा तसेच मंडळे, महामंडळे, महानगरपालिका, नगरपालिका, जिल्हा परिषदा, शासकीय अनुदान प्राप्त संस्था, सहकारी संस्था, विद्यापिठे व शासकिय उपक्रम इत्यादींच्या आस्थापनेवरील वर्ग-३ व वर्ग-४ मधील पदांच्या भरतीच्यावेळी समाजकल्याण अधिकारी/जिल्हा आदिवासी विकास अधिकारी/जिल्हा प्रकल्प अधिकारी यांना १५ दिवस अगोदर कळविण्याबाबतच्या सूचना या विभागाच्या दिनांक १५ मार्च,१९८९ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या आहेत. सदर सूचना पुन्हा निर्गमित करण्यात येत आहे.

२. शासकीय/निमशासकीय सेवा तसेच मंडळे, महामंडळे इत्यादीच्या आस्थापनेवरील वर्ग-३ वर्ग-४ मधील पदावर सरळ सेवा प्रवेशाने मागासवर्गीय उमेदवारांची भरती करण्यासाठी घेण्यात येणाऱ्या मुलाखतीच्यावेळी समाजकल्याण अधिकारी/जिल्हा आदिवासी विकास अधिकारी/जिल्हा प्रकल्प अधिकारी वर्ग-२ यांना हजर राहण्यासाठी बोलाविण्यात यावे व त्यांना सदर मुलाखतीस हजर राहणे सोयीस्कर व्हावे म्हणून त्यांना त्याबाबतची सूचना १५ दिवस आधी देण्यात यावी. परंतू कांही कारणास्तव या अधिका-यांना सदरील मुलाखतीसाठी हजर राहणे शक्य नसेल तर त्यांनी त्यांचा प्रतिनिधी पाठवावा परंतू तो अधिकारी वर्ग-२ पेक्षा कमी दर्जाचा नसावा.

३. शासनाच्या असेही निदर्शनास आले आहे की, काही वेळा समाजकल्याण अधिकारी /जिल्हा आदिवासी विकास अधिकारी/जिल्हा प्रकल्प अधिकारी वर्ग-२, हे अधिकारी मुलाखतीस हजर राहत नाहीत, नियुक्ती प्राधिकारी त्यांच्या गैरहजेरीत मागासवर्गीय उमेदवारांच्या मुलाखती घेतात व त्या अधिका-यांची निवड केलेल्या मुलाखतीच्या यादींवर



एच- ८६२ (५०००-१२-०१) १.

स्वाक्षरी घेतात. ही बाब आक्षेपार्ह असून अशा पध्दतीने निवड केलेल्या उमेदवारांची यादया अवैध ठरविल्या जातील.त्याचप्रमाणे अशीही सूचना देण्यात येते की, खुल्या प्रवर्गातील उमेदवारांबरोबर मागासवर्गीय उमेदवारांच्या मुलाखती घेण्यात येऊ नयेत त्या स्वतंत्रपणे घेण्यात याव्यात.

४. सर्व मंत्रालयीन विभागांना पुन्हा सूचना देण्यात येते की, त्यांनी त्यांच्या अधिपत्याखाली येणाऱ्या सर्व नियुक्ती अधिकाऱ्यांना वरील सूचना पुन्हा द्याव्यात. तसेच,याबाबतची अंमलबजावणी न करणा-या संबंधीत नियुक्ती प्राधिका-याविरुध्द कडक कारवाई करण्यात यावी. वर्ग-३ व वर्ग-४ मधील पदांच्या भरतीच्यावेळी मुलाखती घेण्यासाठी उपस्थित न राहणा-या समाजकल्याण अधिकारी, जिल्हा आदिवासी विकास अधिकारी/जिल्हा प्रकल्प अधिकारी विरुध्द कडक कारवाई करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**शैला तारगे-पाटील**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन.**

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त यांची कार्यालये,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक,लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,
अध्यक्ष , सर्व जिल्हा निवड समिती कार्यालये,
संचालक, समाजकल्याण, पुणे,
संचालक, सेवायोजन, मुंबई,
संचालक, आदिवासी विकास, नाशिक,
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
सर्व जिल्हा प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी प्रकल्प,
सर्व जिल्हा सेवायोजन अधिकारी,
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील इतर सर्व विभागप्रमुख/कार्यालय प्रमुख,
*** पत्राने.**



(हस्तलिखित) मचमु-८६-२ (५०००-१२-०१) ३७.